**केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य योजनांतर्गत भाग -५ ऑप्टीकल फायबर केबल नेटवर्क प्रकल्प सन २०२२-२३ या वर्षात राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता तसेच निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अर्थसं-२०२३/प्र.क्र.११/३९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : - २० मार्च, २०२३.

वाचा :- १. वित्त मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ४४(१) /PF-S/२०२२-२३ (CAPEX), दि. ०६/०४/२०२२.
२. केंद्र शासनाचे Department of Expenditure दि.३०/०९/२०२२ रोजीचे पत्र.
३. वित्त विभागाचे पत्र क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र. १४/अर्थबळ, दि. १४/११/२०२२.
४. सामान्य प्रशासन विभागाचे शासन निर्णय क्र. साप्रवि-२०२२/प्र.क्र.१३२/से-१/३९, दि.१६/१२/२०२२.
५. सामान्य प्रशासन विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्र. साप्रवि-२०२२/प्र.क्र.१३२/से-१/३९, दि.०९/०१/२०२३.
६. वित्त विभागाचे पत्र क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१४/भाग-२/अर्थबळ, दि.२६/१२/२०२२
७. वित्त विभागाचे पत्र क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१४/अर्थबळ, दि.०७/०२/२०२३.
८. माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे पत्र क्र. मातंस/केंपुविसयो-२०२२/प्र.क्र.०८ /रोख/२०२२, दि. ३०/०१/२०२३ आणि दि. १७/०२/२०२३.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत राज्यास उपलब्ध होणा-या ५० वर्ष मुदतीचे बिनव्याजी कर्ज सन २०२२-२३ मध्ये एकूण ७ भागांत उपलब्ध होणार आहे. सदर योजनेतील भाग -५ ऑप्टीकल फायबर केबल नेटवर्क वापरून शेवटच्या टप्प्यातील जोडणी (Last Mile Connectivity) साठी केंद्र शासनाचे अर्थ सहाय्य प्राप्त झाले आहे. सदर प्रकल्पास केंद्र शासनाच्या दि.३०/०९/२०२२ रोजीचे पत्रान्वये Department of Expenditure (DoE) यांची मंजूरी प्राप्त झाली असून या प्रकल्पासाठी केंद्र शासनाने रु २८६.०० कोटी कर्ज मंजूर केले आहे.

२. सदर योजनेच्या अनुषंगाने दि.१६/१२/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्पासाठी लेखाशीर्ष ५२७५००१२ (कार्यक्रम) हा नव्याने स्वतंत्र लेखाशीर्ष तयार करण्यात आला आहे. प्रकल्पाकरीता वित्त विभागाकडून SSM लॉगीन निर्माण करुन देण्यात आले असून USER ID MHSSM८८ असा आहे. तसेच ऑप्टीकल फायबर केबल नेटवर्क वापरून शेवटच्या टप्प्यातील जोडणी (Last Mile Connectivity) योजना राबविण्याकरिता बँक ऑफ महाराष्ट्र, मंत्रालय शाखा येथे संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय यांचे First Level Agency म्हणून खाते उघडले असून महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ यांना निधी वितरीत करण्यासाठी Second Level Agency म्हणून उपखाते उघडण्यात आले आहे. त्यानुषंगाने माहिती तंत्रज्ञान संचालनालय यांनी उपरोक्त प्रकल्पास रु.२८६.०० कोटी खर्चास शासन स्तरावर मान्यता देण्याची विनंती केली आहे. सदर प्रकल्पास केंद्र शासनाची मान्यता आहे. तरी, राज्य स्तरावर सदर प्रकल्पास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची तसेच प्रकल्पास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग -५ ऑप्टीकल फायबर केबल नेटवर्क वापरून शेवटच्या टप्प्यातील जोडणी (Last Mile Connectivity) या योजनेच्या अनूषंगाने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच, यासाठी राज्यास उपलब्ध होणा-या ५० वर्ष मुदतीचे बिनव्याजी रु.२८६.०० कोटी कर्जातून होणा-या खर्चास खालील नमूद बाबींचा विचार करुन वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. यानुषंगाने कामाचा तपशील खालील प्रमाणे आहे :-

'या योजनेअंतर्गत ग्रामीण भागातील नागरिकांपर्यंत उच्च गतीची इंटरनेट सुविधा उपलब्ध करुन देण्याकरिता भारत नेट प्रकल्पांतर्गत शेवटच्या टप्प्यातील जोडणी (Last Mile Connectivity) करुन जास्तीत जास्त शासकीय कार्यालयांना एकमेकांशी जोडून तसेच अतिरिक्त खाजगी जोडण्या करुन महसूल निर्मिती करण्याचा प्रयत्न करण्यात येणार आहे.'

२. केंद्र राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग -५ ऑप्टीकल फायबर केबल नेटवर्क वापरून शेवटच्या टप्प्यातील जोडणी (Last Mile Connectivity) प्रकल्पाकरीता रु. २८६,००,००,०००/- (रु. दोनशे शहाऐंशी कोटी फक्त) एवढा निधी प्रकल्प राबविण्याकरीता महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ यांना वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. या बाबतचा होणारा खर्च "मागणी क्र. ए-९, ५२७५- इतर दळणवळण सेवांवरील भांडवली खर्च, ००, १०१- इतर दळणवळण सुविधा, (०१) केंद्र शासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेअंतर्गत बिनव्याजी कर्ज (केंद्र हिस्सा १०० टक्के), (०१ )(०२) ऑप्टीकल फायबर केबल प्रकल्प (योजना भाग ०५), (५२७५००१२) ५३- मोठी बांधकामे " या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा. याकरीता कक्ष अधिकारी, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

३. शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे देयक सादर करुन प्राप्त निधी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही माहिती तंत्रज्ञान संचालनालय, रोखशाखा कार्यासनाने करावी.

४. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य योजनेच्या भाग - १ खालील प्राप्त होणाऱ्या कर्जाच्या रक्कमांसाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाने खर्चाचा संपूर्ण विनियोग होईपर्यत लेखे अद्ययावत ठेवावेत.

५. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रकमेतून खर्च केलेला रकमांचा तपशील प्रत्येक महिन्याला राज्य शासनास तसेच माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय यांना सादर करावा. तसेच, लेखापरिक्षणासाठी शासनाने नियुक्त केलेल्या यंत्रणेस उपलब्ध करुन द्यावा.

६. सदर निधी वितरणासाठी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र. ४३/अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं

९९/१४४३ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं १५४/व्यय-४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०३२०१८२६२९८४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MEDHA TUKARAM BHOGAONKAR

Digitally signed by MEDHA TUKARAM BHOGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISRTATION DEPARTMENT, 2.5.4.20=96a1fe66afdd420561c3a847db8f18bce30ddbfdf7a68a58b99e4223866944d4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=884A6C0205737FA82DF041D7E1D363D3316E735A0C1C0ADABC3B3F0B6C1E3015, cn=MEDHA TUKARAM BHOGAONKAR
Date: 2023.03.20 18:37:52 +05'30'

**( मेधा भोगांवकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
४. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. प्रधान सचिव, (माते), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मुंबई.
८. महालेखापाल, ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई/नागपूर.
१०. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.२५), मंत्रालय, मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. निवड नस्ती.